बिगर आदिवासी सर्वसाधारण योजने अंतर्गत
गोंदिया जिल्ह्यातील दोन श्रेणी-२ च्या पशुवैद्यकीय
दवाखान्यांचा दर्जावाढ करुन त्याचे रुपांतर
श्रेणी-१ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यात करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक:व्हीएचडी-२०११/प्र.क्र.२६४/पदुम-४
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ३ सप्टेंबर, २०११.

वाचा :-१) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा
समक्रमांकाचा शासन निर्णय, दि.९.८.२०११.
२) वित्त विभागाचे परिपत्रक क्र :पूरक-२०११/प्र.क्र.१४७/ अर्थसंकल्प-३, दि.६.८.२०११

**प्रस्तावना :-**

बिगर आदिवासी सर्वसाधारण योजनेअंतर्गत गोंदिया जिल्ह्यातील दोन श्रेणी-२ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यांचा दर्जावाढ करुन त्याचे रुपांतर श्रेणी-१ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यात करण्यासाठी नव्याने निर्माण केलेली पदे व त्यांच्या वेतन व भत्यावरील खर्च विधी मंडळाच्या निदर्शनास आणण्यासाठी सादर करण्यात आलेल्या पूरक मागणी प्रस्तावास जुलै-ऑगस्ट, २०११ च्या पावसाळी अधिवेशनात विधी मंडळाने मान्यता प्रदान केलेली असल्याचे "वाचा" येथील दि.६.८.२०११ च्या परिपत्रकान्वये कळविण्यात आलेले आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

बिगर आदिवासी सर्वसाधारण योजनेअंतर्गत गोंदिया जिल्ह्यातील दोन श्रेणी-२ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यांचा दर्जावाढ करुन त्याचे रुपांतर श्रेणी-१ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यात करण्यासाठी नव्याने निर्माण करण्यात आलेल्या पदावरील वेतन व भत्यासाठीचा खर्च सन २०११-१२ मध्ये सांकेतांक क्र.२४०३ २४४ ८ याखाली राज्यस्तरीय योजनेत उपलब्ध असलेल्या निधीमधून खर्च भागविण्यास याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सन २०११-१२ मध्ये वेतन व भत्यासाठी जास्त निधीची आवश्यकता भासणार असल्यास तो निधी पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन घेण्यात यावा.

त्याचप्रमाणे दर्जावाढ करण्यात आलेल्या दवाखान्यावरील वेतनोत्तर बाबीवरील खर्च सन २०११-१२ मध्ये जिल्हा नियोजन समितीकडून उपलब्ध झालेल्या निधीमधून भागविण्यात यावा. चालू आर्थिक वर्षात पुरेसा निधी उपलब्ध नसल्यास तो जिल्हा नियोजन समिती, गोंदिया यांचेकडून पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन घेण्यात यावा.

**नवनिर्मित पशुधन विकास अधिकाऱ्यांच्या पदांबाबत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे पाठवावयाच्या मागणीपत्राचा प्रस्ताव आयुक्त, पशुसंवर्धन यांनी तात्काळ शासनास सादर करावा.**

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(डॉ.मा.ना.सवाईसोनकांबळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**
मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
वित्त विभाग (व्यय-२/वित्तीय सुधारणा-१/अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई-३२.
आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
जिल्हाधिकारी, गोंदिया
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), मुंबई/नागपूर.
प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया
जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गोंदिया
जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, गोंदिया
जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया
जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया
अवर सचिव (पदुम-३/१६), कक्ष अधिकारी (पदुम-१/१६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती.